**अवैध गौण खनिज उत्खनन व वाहतुकीबाबत प्राप्त तक्रारीच्या अनुषंगाने कार्यवाही करण्याबाबतची कालमर्यादा निश्चित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः- गौखनि १०/०२२५/प्र.क्र.७२/ख-२**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक:- ०७ मार्च, २०२४

**प्रस्तावना:-**

राज्यातील अवैध गौण खनिजाच्या उत्खनन व वाहतूकीबाबत स्थानिक लोकप्रतिनिधी व सामान्य नागरिक यांच्याकडून मोठया प्रमाणात शासनस्तरावर व क्षेत्रीय स्तरावर तक्रारी/निवेदने प्राप्त होत आहेत. अशा तक्रारीचे निवारण व त्याची शहानिशा करण्याच्या अनुषंगाने चौकशी करणे आवश्यक आहे. अशा प्राप्त तक्रारी/निवेदनावर कार्यवाही करण्याबाबतची निश्चित अशी कालमर्यादा घालणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने अवैध गौण खनिज उत्खनन व वाहतूकीबाबत प्राप्त तक्रारी/निवेदनाच्या अनुषंगाने कार्यवाही करण्याबाबतची कालमर्यादा निश्चित करून त्यानुषंगाने कार्यवाही करण्याबाबत शासन परिपत्रकान्वये क्षेत्रीय यंत्रणास सूचना देणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने सूचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन परिपत्रक:-**

सामान्य नागरीक व स्थानिक लोकप्रतिनीधी यांच्याकडून अवैध गौण खनिज उत्खनन व वाहतुकीबाबत प्राप्त तक्रारी/निवेदनाच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे कार्यवाही करण्याच्या सूचना देण्यात येत आहेत.

(i) सामान्य नागरीक व स्थानिक लोकप्रतिनिधींकडून क्षेत्रीय अधिकारी/कार्यालयास अवैध गौण खनिज उत्खनन व वाहतूक या विषयाबाबात प्राप्त झालेल्या तक्रारी/निवेदने, तसचे शासनस्तरावर क्षेत्रीय यंत्रणेकडे वर्ग करण्यात आलेल्या अशा प्रकारच्या तक्रारी/निवेदने यांच्या अनुषंगाने क्षेत्रीय यंत्रणेकडून तक्रारी/निवेदनामधील मुद्यांच्या अनुषंगाने निवेदन प्राप्त झाल्यापासून ०७ दिवसात प्रत्यक्ष पाहणी करुन चौकशीची कार्यवाही करण्यात यावी.

(ii) तक्रारीच्या चौकशीमध्ये अवैध गौण खनिज उत्खनन व वाहतूक आढळून आल्यास पुढील १५ दिवसात संबंधिता विरुध्द महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ चे कलम ४७ (७) व ४७ (८) अन्वये, तसेच गौण खनिज उत्खनन (नियम व विनियमन) नियम, २०१३ मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी दंडात्मक कार्यवाही करावी.

(iii) अशा प्रकारच्या तक्रारी/निवेदनाच्या अनुषंगाने केलेल्या कार्यवाहीबाबतची माहिती संबंधित तक्रारदार/निवेदन धारकांना लेखी कळविण्यात यावी.

(iv) स्थानिक लोकप्रतिनिधी यांच्याकडुन प्राप्त झालेल्या तक्रार अर्जावर केलेल्या कार्यवाहीबाबतची माहिती तात्काळ स्थानिक लोकप्रतिनिधींना कळविण्यात यावी.

(v) उपरोक्त प्रमाणे नमूद करण्यात आलेल्या कालावधीत तक्रारी/निवेदनाच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यात न आल्यास व संबंधित तक्रारदार/निवेदनधारकाला विहीत कालावधीत न कळविल्यास संबंधित सक्षम अधिकाऱ्यांना जबाबदार धरण्यात येवून विभागीय चौकशीची कारवाई करण्यात येईल.

०२. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३०७१४१६४९५४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SADANAND GOVIND MOHITE

Digitally signed by SADANAND GOVIND MOHITE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=9bd008875b6a3a9fddad3e55fe0328df13a27221cb2bbc67abd0155f914efc01, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6590E2301450C474B246074049174C79201BCAD9E5EB15E8F21C282EAEFEDA38, cn=SADANAND GOVIND MOHITE
Date: 2025.03.07 14:18:54 +05'30'

**(सदानंद गो. मोहिते)**
**कार्यासन अधिकारी, महसूल व वन विभाग**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल,मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई.
३. मा. विधानसभा अध्यक्ष यांचे खासगी सचिव, विधानमंडळ, मुंबई
४. मा. विधानपरिषद सभापती यांचे खासगी सचिव, विधानमंडळ, मुंबई
५. मा.मंत्री (महसूल) यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. सर्व मा. मंत्री/मा. राज्यपाल यांचे खासगी सचिव, मंत्रालय मुंबई.
८. सर्व मा. विधानसभा/विधानपरिषद सदस्य
९. सर्व मंत्रालयीन विभाग
१०.सर्व विभागीय आयुक्त
११.सर्व जिल्हाधिकारी
१२.सर्व उपविभागीय अधिकारी
१३.सर्व तहसिलदार
१४.संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर
१५.निवडनस्ती “ख-२” कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.